क्र.-संकिर्ण- १०१५/प्र.क्र.७४/११-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई -४०० ०३२.
दिनांक - २६ ऑगस्ट,२०१५

**प्रति,**

सर्व मंत्रालयीन विभाग,

आस्थापना शाखा

**विषय :- <u>विभागीय चौकशी</u>**
**कंत्राटी तत्वावर नियुक्तीसाठी इच्छुक सेवानिवृत्त चौकशी अधिकाऱ्यांची सामायिक यादी (पॅनल)**

या विभागाच्या दि.२२ ऑक्टोबर,२०१३ च्या पत्रान्वये कंत्राटी तत्वावर "चौकशी अधिकारी" म्हणून काम करण्यास इच्छुक असणा-या ९६ सेवानिवृत्त अधिका-यांची नावे असलेली सामायिक यादी (पॅनल) प्रसिध्द करण्यात आली आहे. या यादीतील अ.क्र.३० येथिल श्री.यु.एस.भोई, सेवानिवृत्त चौकशी अधिकारी यांचे नाव दि.१ जुलै,२०१४ च्या पत्रान्वये यादीतून वगळण्यात आले आहे. तसेच, या विभागाच्या दि.३० मार्च, २०१५ च्या पत्रान्वये ९ सेवानिवृत्त अधिकाऱ्यांची यादी प्रसिध्द करण्यात आली आहे.

आता, आणखी ६ सेवानिवृत्त अधिका-यांनी इच्छुकता कळविली असल्याने त्यांची नावे समाविष्ट करुन सेवानिवृत्त अधिकाऱ्यांची पुरक सामायिक यादी (पॅनल) सोबत जोडली आहे.

०२. विभागाने शिस्तभंगविषयक प्राधिकरणाच्या मान्यतेने सोबतच्या एकत्रित सामाईक यादीमधून कंत्राटी पध्दतीने चौकशी अधिका-यांची शा.नि., सा.प्र. वि., क्र.एसपीओ-२८०४/ प्र.क्र.११ /२००४ /११-अ, दि. २६ मे, २००६ व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसपीओ-२८०७/प्र.क्र.२१/०७/११-अ, २८ ऑक्टोबर, २००९ मधील तरतुदीनूसार नियुक्ती करावी.

अशा नियुक्त केलेल्या कंत्राटी चौकशी अधिका-यांनी त्यांच्या कामकाजात कसूर केली किंवा कसे यावर संबंधित शिस्तभंगविषयक प्राधिका-यांनी लक्ष ठेवावे. त्यांच्या कामात काही कसुर आढळल्यास, त्याबाबतच्या समर्थनीय कारणांसह शिस्तभंगविषयक प्राधिकारी यांनी सामान्य प्रशासन विभागास अहवाल सादर करावा. या प्रकरणी चौकशी अधिकारी दोषी आढळल्यास कोणतेही कारण / नोटीस न देता संबंधित कंत्राटी चौकशी अधिकारी यांचे नाव यादीमधून वगळण्यात येईल.

०३. या विभागाच्या असेही निदर्शनास आले आहे की, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालये, या विभागाच्या दि.२२ ऑक्टोबर,२०१३ व ३० मार्च,२०१५ च्या पत्रान्वये प्रसिध्द केलेल्या यादीतील सेवानिवृत्त चौकशी अधिका-यांकडे विभागीय चौकशीची प्रकरणे न देता, यापूर्वीच्या रद्द केलेल्या यादयांमधील/पॅनलमधील सेवानिवृत्त चौकशी अधिका-यांकडे प्रकरणे सोपविलेली आहेत. तसेच, या अधिका-यांनी विभागीय चौकशीची प्रकरणे योग्यरित्या हाताळली नसल्याच्या तक्रारी काही विभाग/ कार्यालयांकडून या विभागाकडे प्राप्त होत आहेत.

०४. या अनुषंगाने सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना कळविण्यात येते की, शासन पत्र, दि.२२ ऑक्टोबर,२०१३, ३० मार्च,२०१५ व आता प्रसिध्द केलेल्या सामायिक यादीतील सेवानिवृत्त चौकशी अधिकाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कोणत्याही कंत्राटी/ सेवानिवृत्त अधिका-यांकडे नव्याने कोणतीही प्रकरणे सोपविण्यात येऊ नयेत.

०५. वरील एकत्रित सामायिक यादी (पॅनल) महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०८२६१२४११२८४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

BHAT VENKATESH MADHAV

Digitally signed by BHAT VENKATESH MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMIN DEPT,CID - 916890, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6e277c9088a4cb8b53e535a4642a6800b908c5dbdb3a63175760874eba717ae1, cn=BHAT VENKATESH MADHAV
Date: 2015.08.26 12:46:50 +05'30'

**(व्यं.मा.भट)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**सोबत-** ६ सेवानिवृत्त चौकशी अधिका-यांची सामायिक यादी (पॅनल )

**प्रत माहितीसाठी सादर-**

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व जिल्हाधिकारी,
३. मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग,
४. संबंधित सेवानिवृत्त अधिकारी / कर्मचारी

**शासन पत्र क्र.संकीर्ण -२०१५/प्र.क्र.७४/११-अ दि. २६.०८.२०१५ सोबतची विभागीय चौकशी प्रकरणे कंत्राटी पध्दतीने निकाली काढण्यासाठी इच्छुक असणाऱ्या सेवानिवृत्त चौकशी अधिकाऱ्यांची पुरक सामायिक यादी (पॅनल)**

| अ.क्र. | सेवानिवृत्त अधिकाऱ्यांचे नांव, जन्म दिनांक, वय व सेवानिवृत्तीचा दि. | सेवानिवृत्त होताना धारण केलेले पद व वेतनश्रेणी | सेवानिवृत्त अधिकाऱ्यांचा निवासी पत्ता व दूरध्वनी क्रमांक | कोणत्या विभागात / जिल्ह्यात काम करण्याची इच्छा आहे. |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.सुधाकर रा. चव्हाण<br>ज.दि.२१.०८.१९५६<br>वय ५८ वर्ष<br>से.नि.दि. ३१/०८/२०१४ | सहसचिव<br>३७४००-६७०००+<br>ग्रेड पे ८७०० | सी-३६, सुयोग आदित्य रसिडेन्सी, बिबवेवाडी, पुणे-३७<br>०२०-२४२१६१६४ | पुणे |
| २ | श्री.सि.रा.शिंदे,<br>ज.दि.२०.०६.१९५५<br>वय ६० वर्ष<br>से.नि.३०/६/२०१३ | सॉलिसीटर-नि-सहसचिव<br>३७४००-६७०००+<br>ग्रेड पे ८७०० | बी.-७०३, तिरुपती आयकॉन, प्लॉट नं.४-५, सेक्टर नं.२०, कामोठे, नवी मुंबई-४१०२०१<br>९८९२३९३८६७ | सर्व शासकीय विभाग |
| ३ | श्री.एन.एस. अंबादे,<br>ज.दि.१.१.१९४८<br>वय ६७ वर्ष<br>से.नि.३१.१२.२००५ | तहसिलदार<br>७४५०-११५०० | भीमनगर भावसिंगपूरा, म.ना.पा.शाळे समोर छायानिवास, औरंगाबाद<br>९८६०९५५००२ | सर्व शासकीय विभाग |
| ४ | श्री.हिंदूराव ल. पवार<br>ज.दि.१.६.१९५७<br>वय ५८<br>से.नि.३१.५.२०१५ | सहसंचालक<br>१५६००-३९१००० +<br>ग्रेड पे ७६०० | सेक्टर १९, प्लॉट क्र.९९, कोयना नगर, चिंचवड प्राधिकरण, आकुर्डी ते चिखली रोड, पुणे-४११ ०१९<br>९४२२६६०८६३ | पूणे विभाग व ठाणे जिल्हा |
| ५ | श्री. रमाकांत मा. अस्मर<br>ज.दि.९.१०.१९५३<br>वय ६२ वर्ष<br>से.नि.दि.३१.१०.२०११ | सहसचिव<br>३७४००-६७०००+<br>ग्रेड पे ८७०० | १००१, रेणुका को.ऑप.हौ.सोसायटी, गुरुनानक हॉस्पीटलसमोर, कला नगर, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१<br>९९६७६११९९९ | महसूल व वने विभाग/ अन्य कोणतीही शासकीय / निमशासकीय कार्यालये (मुंबई/पुणे/ नाशिक) |
| ६ | श्री.रुपराव न.देशमुख,<br>ज.दि.१.७.१९५५<br>वय ६० वर्ष<br>से.नि.,दि.३०.०६.२०१३ | सहसचिव<br>३७४००-६७०००+<br>ग्रेड पे ८७०० | एच-३/५०४, म्हाडा कॉलनी, प्रतिक्षानगर, सायन (पू.), मुंबई-२२ | कोकण व पुणे विभाग |

BHAT VENKATESH MADHAV

Digitally signed by BHAT VENKATESH MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMIN DEPT,CID - 916890, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6e277c9088a4cb8b53e535a4642a6800b908c5dbdb3a63175760874eba717ae1, cn=BHAT VENKATESH MADHAV
Date: 2015.08.26 12:47:22 +05'30'

(व्यं.मा.भट)
उप सचिव, महाराष्ट्र शासन